<u>अवर सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांच्या</u>
<u>नियतकालिक बदल्या - सन २०१७.</u>

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः असब-१२१७/प्र.क्र.१८/का.१४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ३१ मे, २०१७

**आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ च्या कलम ४(१), ४(२) व ४(३) अनुसार मंत्रालयीन संवर्गातील खाली नमूद केलेल्या अवर सचिवांची बदली करण्यात येत असून, त्यांच्या नावासमोर स्तंभ ४ मध्ये दर्शविलेल्या विभागामध्ये त्यांची पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याचा विभाग | बदलीनंतरचा विभाग |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री.मं.र.शेळके | गृह विभाग | ग्राविवजसंवि |
| २ | श्री वि.रा.थोरात | महसूल व वन विभाग | वैशिवऔद्रवि |
| ३ | श्री. श्री.श्री.घोलप | महसूल व वन विभाग | सपववि |
| ४ | श्री. सु.बा.तुंबारे | सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग | मववि |
| ५ | श्री.शं.त्र्यं.जाधव | ग्राम विकास व जलसंधारण विभाग | जलसंपदा विभाग |

२. वर नमूद केलेल्या अधिकाऱ्यांच्या बदल्यांची तात्काळ अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने पुढील सूचनांचे सर्व संबंधित विभागांनी कटाक्षाने पालन करावे.

(१) बदली झालेल्या अधिकाऱ्यांच्या संबंधित विभागाने पर्यायी अधिकारी हजर होण्याची प्रतिक्षा न करता त्या विभागातील अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. बदली झालेल्या अवर सचिव अधिकाऱ्यांना कार्यमुक्त करण्याचा कालावधी जास्तीत जास्त दिनांक ०५ जून २०१७ (म.नं.) पर्यंत राहिल.

(२) बदली झालेले अधिकारी बदलीच्या आदेशानुसार अन्य विभागातून कार्यमुक्त होवून रुजू होण्यासाठी विभागात आल्यानंतर त्यांना विनाविलंब हजर करुन घ्यावे. एखाद्या अधिकाऱ्याला रुजू करुन न घेतल्यामुळे सक्तीचा प्रतिक्षाकाळ मंजूर करण्याचा प्रसंग उद्भवल्यास संबंधित विभागाच्या आस्थापना अधिकाऱ्याला जबाबदार धरण्यात येईल.

(३) बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईस पात्र ठरतील.

(४) सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व अधिकाऱ्यांचे कार्यमुक्ततेच्या दिनांकापर्यंतचे व जास्तीत जास्त माहे मे, २०१७ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. माहे जून,२०१७ पासूनचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपूर्वीच्या विभागाकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित अधिकारी बदलीच्या विभागात हजर

झाल्यानंतर बदलीनंतरच्या विभागाने काढावे व तसा अहवाल सामान्य प्रशासन विभागास सादर करावा. माहे जून, २०१७ नंतरचे वेतन बदलीपूर्वी कार्यरत असलेल्या विभागातील आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना व्यक्तीश: जबाबदार धरण्यात येईल. तसेच बदली केलेल्या अधिकाऱ्यांचे जास्तीत जास्त माहे मे, २०१७ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने अदा करावयाचे असून, माहे जून, २०१७ पासूनचे वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे असल्याबाबत अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांनाही कळविण्यात येत आहे.

३. विभागाने बदली झालेल्या अवर सचिव अधिकाऱ्यांना दि.०५.०६.२०१७ (म.नं.) पर्यंत कार्यमुक्त न केल्यास शासन निर्णय क्र. संकीर्ण २०१६/प्र.क्र.१८६/१५/का.१४, दिनांक २३ डिसेंबर, २०१६ मधील तरतुदीनुसार, सामान्य प्रशासन विभागाकडून एकतर्फी कार्यमुक्त करण्याची कार्यवाही करण्यात येईल याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. मंत्रालयीन विभागातील सर्व संवर्गातील अधिकारी/कर्मचाऱ्यांना राज्य प्रशिक्षण धोरणानुसार, बदलीनंतरच्या प्रशिक्षणाची कार्यवाही करण्यासंदर्भात शासन परिपत्रक क्रमांक: कअनि १११६/प्र.क्र.३२/१४-ब, दिनांक २३.०५.२०१६ अन्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. त्यानुसार, विभागात बदलीने रुजू झालेल्या अवर सचिव अधिकाऱ्यांना बदलीनंतरचे प्रशिक्षण संबंधित मंत्रालयीन विभागांनी आयोजित करावे.

५. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना संबंधित विभागाने कार्यमुक्त करुन या विभागास कळवावे. तसेच बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यावर पदस्थापना दिलेल्या विभागात तात्काळ रुजू व्हावे.

६. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०१७०५३१२०२७३३७९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Imtiyaz Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2017.05.31 20:32:56 +05'30'

( इ.मु.काझी )
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
२.मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३. अ.मु.स (सेवा), सा.प्र.वि., मंत्रालय, मुंबई,
४.अ.मु.स./प्र.स./सचिव, संबंधित मंत्रालयीन विभाग,
५.सह/उप सचिव(आस्थापना), संबंधित मंत्रालयीन विभाग,
६.संबंधित अधिकारी, विभागामार्फत,
(४ ते ६: संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
७.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ,

त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या अधिकाऱ्याचे जास्तीत जास्त माहे मे, २०१७ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. माहे जून २०१७ पासून वेतन बदली झालेल्या विभागामार्फत अदा करावयाचे आहे. सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

८.आहरण व संवितरण अधिकारी, संबंधित मंत्रालयीन विभाग (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

त्यांना कळविण्यात येते की, बदली केलेल्या अधिकाऱ्यांचे माहे मे, २०१७ पर्यंतचे वेतन सध्या कार्यरत असलेल्या विभागाने काढावे. त्यानंतरचे वेतन संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्याने अदा केल्यास त्यांना याबाबत व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल. त्यांच्याविरुध्द नियमानुसार योग्य ती कारवाई करण्यात येईल.

९.निवडनस्ती-कार्या.१४.